**पुणे व पिंपरी-चिंचवड शहरामध्ये सीसीटीव्ही प्रकल्पाच्या कार्यान्वयनासाठी सल्लागार म्हणून मे.पीडब्ल्युसी या कंपनीला मुदतवाढ देण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सीसीटी-३६१६/प्र.क्र.७६/भाग-१/पोल-३**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक
दुसरा मजला, मंत्रालय, मुंबई-३२
दिनांक: ५ जुन, २०१७

**वाचा :**

**१) माहिती व तंत्रज्ञान विभाग, शासन निर्णय क्र. GAD-मातंस ०८०/४/२०१४-O/o Directorate of IT-DIT (MH), दि.१.७.२०१४.**

**२) गृह विभाग शासन निर्णय, क्र.गृहआ २०१५/प्र. क्र.२३०/आस्था-२, दि.२०.०५.२०१५.**

**३) गृह विभाग शासन निर्णय क्र. सीसीटी ३६१५/प्र.क्र.९३/पोल-३, दि. २९.०५.२०१५ व दि. २५.०७.२०१६**

**४) पोलीस आयुक्त, पुणे शहर यांचे दि.२१.१०.२०१६ चे पत्र.**

**५) मे.प्राईसवॉटरहाऊस कुपर्स लि. यांचे दि. ५.११.२०१६ चे पत्र.**

**प्रस्तावना :**

गृह विभागामार्फत राबविण्यात येणाऱ्या पुणे व पिंपरी चिंचवड शहरतील सीसीटीव्ही प्रकल्पाच्या अंमलबजावणीसाठी सल्लागार म्हणुन मे.पीडब्ल्युसी या कंपनीची गृह विभाग शासन निर्णय दि. २९.०५.२०१५ अन्वये दि. ३०.०४.२०१६ पर्यंत नियुक्ती करण्यात आली होती. त्यानंतर गृह विभाग शासन निर्णय दि. २५.०७.२०१६ अन्वये दि. ३१.१०.२०१६ रोजीपर्यंत मुदतवाढ दिलेली होती. पुणे सीसीटीव्ही प्रकल्पाचा कार्यान्वयन कालावधी चालू असल्याने तसेच पोलीस प्रशासनाला तांत्रिक बाबतीत मदत करण्यासाठी पोलीस आयुक्त, पुणे शहर यांनी दि. २१.१०.२०१६ रोजीच्या पत्रान्वये केलेल्या विनंतीनुसार सदर सल्लागार कंपनीला मुदतवाढ देणे आवश्यक आहे. दि.२०.०५.२०१५ रोजीच्या शासन निर्णयान्वये गृह विभागातील ई-गर्व्हनन्स प्रकल्प राबविण्यासंदर्भात विविध निर्णय घेण्यासाठी प्रकल्प अंमलबजावणी समिती (PIC) स्थापन करण्यात आलेली आहे. सदर समितीने पुणे सीसीटीव्ही प्रकल्पासाठी सल्लागार म्हणून मे.पीडब्ल्युसी कंपनीच्या एका वरीष्ठ सल्लागारास दि.१.११.२०१६ ते दि. ३०.६.२०१७ पर्यंत मुदतवाढ देण्यास चक्रीय पद्धतीने मान्यता दिलेली आहे. त्यानुषंगाने शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :**

दि.२०.०५.२०१५ रोजीच्या शासन निर्णयान्वये अपर मुख्य सचिव (गृह) यांच्या अध्यक्षतेखाली स्थापन करण्यात आलेल्या प्रकल्प अंमलबजावणी समितीने चक्रीय पद्धतीने दिलेल्या मान्यतेनुसार पुणे व पिंपरी-चिंचवड शहर सीसीटीव्ही प्रकल्पासाठी सल्लागार म्हणून मे.प्राईस वॉटर हाऊस कुपर प्रा. लि. या कंपनीच्या एका वरीष्ठ सल्लागारास पुर्णवेळ तत्वावर दि.१.११.२०१६ ते दि. ३०.६.२०१७ पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

२. उपरोक्त सल्लागारास देण्यात येणारे मानधन व इतर भत्ते माहिती व तंत्रज्ञान विभागाच्या संदर्भाधिन क्रमांक १ येथे नमुद दि. ०१.०७.२०१४ च्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार देय असेल.

३. सल्लागारास देण्यात येणारे मानधन हे प्रतीमहा-प्रती व्यक्ती (Man-Month) तत्वानुसार असेल. सदर सल्लागाराची दरमहा देयके शासनास सादर करताना सल्लागाराने महिन्याच्या कालावधीत केलेल्या कामाचा तपशील / अहवाल शासन सादर करणे आवश्यक आहे. यासाठी माहिती व तंत्रज्ञान विभागाच्या संदर्भाधिन क्रमांक १ येथे नमुद दि. ०१.०७.२०१४ च्या शासन निर्णयातील तरतूदी लागू राहतील.

४. पुणे सीसीटीव्ही प्रकल्पासाठी नेमण्यात आलेल्या सल्लागाराच्या मानधनाबाबतचा खर्च पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या अधिनस्त असलेल्या "२०५५ -पोलीस, (००) १०९, जिल्हा पोलीस, (००) (०१) जिल्हा पोलीस बल, १३, कार्यालयीन खर्च (२०५५ ०१६८)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकून तो सन २०१७-१८ या आर्थिक वर्षातील मंजुर अनुदानातून भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०६०५१७१६३४३७२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kailas A. Gaikwad

Digitally signed by Kailas A. Gaikwad
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b31abfcb1894c4c597cc944f19a89f474e7b98a708cc03eb46cd241a604d42bb, cn=Kailas A. Gaikwad
Date: 2017.06.05 17:14:46 +05'30'

**( कैलास गायकवाड )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२. मा.मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
४. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
५. अपर मुख्य सचिव, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
६. प्रधान सचिव ( विषेश ) गृह विभाग , मंत्रालय, मुंबई
७. प्रधान सचिव, माहिती व तंत्रज्ञान, मंत्रालय, मुंबई
८. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
९. पोलीस आयुक्त, पुणे शहर, पुणे
१०.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
११.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१२.जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
१३.निवडनस्ती, पोल-३